**बापाने खारभूमी योजना, तालुका वसई, जिल्हा पालघर या योजनेच्या नूतनीकरण कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१७/(प्र.क्र.३०६/२०१७)/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- १८ जानेवारी, २०१९

**पहावे-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. मुअ/जसंविकोप्र/खारभूमी/पालघर/बापाने/तां-२/३८०३ दिनांक २४/११/२०१७.

**प्रस्तावना:-**

बापाने खारभूमी योजना, तालुका वसई, जिल्हा पालघर ही खारभूमी योजना बृहत आराखड्यात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारा नियमन क्षेत्र (CRZ) अधिनियम १९९१ अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी १२४० मी. आहे. सदर योजना वसई मुख्य खाडी व कामण उपखाडीच्या उजव्या तीरावर आहे. ही योजना बोर्डकालीन असून सदर योजना सन १९७८ मध्ये बांधण्यात आली व या योजनेचे नूतनीकरण अद्याप करण्यात आलेले नाही. त्यावेळी योजना मातीकामात बांधण्यात आलेली आहे. समुद्राच्या नियमित येणा-या भरती-ओहोटी व अतिवृष्टी यामुळे बांधाची मोठया प्रमाणात धूप होऊन व बांधास मोठमोठया खांडी पडून उघाडींचे नुकसान झाले आहे व साखळी क्रमांक ५ मीटर व साखळी क्रमांक ७६० मीटर वरील उघाड्या तुटुन नादुरुस्त झालेल्या आहेत. खांडी पडल्यामुळे व बांध कमकुवत झाल्यामुळे योजनेचे बहुतांश क्षेत्र बाधित झालेले आहे. त्यामुळे शेतकऱ्यांचे मोठे नुकसान झाले आहे. यासाठी ही योजना नूतनीकरण होणे अत्यंत गरजेचे आहे. मूळ योजनेचा बांध व उघाडया शासनाचे नवीन तांत्रिक मानकानुसार नाहीत. त्यामुळे या योजनेचे नवीन तांत्रिक मानकानुसार नूतनीकरण करणे गरजेचे आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत ग्राम पंचायत, लाभधारक व लोकप्रतिनिधी यांचेकडून आग्रही लेखी मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला बापाने खारभूमी योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

बापाने खारभूमी योजना, तालुका वसई, जिल्हा पालघर या योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास खारभूमी विभागाच्या सन २०१६-१७ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रूपये २४८.४६ लक्ष (रुपये दोनशे अठ्ठेचाळीस पूर्णांक सेहेचाळीस शतांश लक्ष फक्त) एवढया रक्कमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये २२५.८७ लक्ष (रुपये दोनशे पंचवीस पूर्णांक

सत्त्याऐंशी शतांश लक्ष फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये २२.५९ लक्ष (रुपये बावीस पूर्णांक एकोणसाठ शतांश लक्ष फक्त) तरतूद असून तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे. सदरील प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, दिनांक २२.६.२०१५ मधील परिच्छेद क्र. २(१) व २(२) मधील तरतुदींनुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुन:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावा. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करणे आवश्यक राहील.

३) सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) या कामाकरीता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

५) सदर प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वीत करण्याच्या विविध टप्प्यांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहित धरता येणार नाही. सदर प्रशासकीय मान्यता देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

६) या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

७) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती यांचे काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

८) सदर प्रकल्पाच्या प्रस्तावित प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

९) संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

सदरहू शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व

उप सचिव जलसंपदा तसेच नियोजन विभागाच्या (कायार्सन-१४३४) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५४/२०१८, दिनांक २२/११/२०१८ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता १९२ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११९१३०३४३७२२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:-** परिशिष्ट अ

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2019.01.19 13:08:42 +05'30'

**( मि. आ. वाणी )**

शासनाचे अवर सचिव

**प्रतिलिपी :-**

१. मा.मंत्री (खारभूमी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
६. मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
११. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव, अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई.
१४. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०१७/(प्र.क्र.३०६/२०१७)/खारभूमी
दिनांक:-१८/०१/२०१९ चे सहपत्र)

## परिशिष्ट-अ

## बापाने खारभूमी योजना, तालुका वसई, जिल्हा पालघर या योजनेच्या नूतनीकरणाचे काम प्रशासकीय मान्यता प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी.

**(रूपये लक्ष)**

| अ.क्र. | उपशीर्ष | एकूण किंमत |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | बी-भूसंपादन | ०.०० |
| ३ | सी- मुख्य बांधकाम | १६८.१७ |
| ४ | एफ - उघाडी बांधकाम | ४५.५९ |
| ५ | के - इमारती | ०.०० |
| ६ | एम - वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | १२.११ |
| | **एकूण कामाची किंमत** | **२२५.८७** |
| | अनुषंगिक खर्च | २२.५९ |
| | **एकूण** | **२४८.४६** |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | १४३ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये १,७३,७५०/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.४४ |

Milind
Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea,
serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2019.01.19 13:09:56 +05'30'

( मि. आ. वाणी )

शासनाचे अवर सचिव